# अतिथी संपादकाच्या लेखणीतून.......

## तो प्रवास सुंदर होता...

कधी कधी आयुष्य चालत असते वेगळ्या दिशेने, आणि आपल्याही मनात कुठे वळावे, असे नसते. पण कधीतरी, कूस बदलत्या ऋतुप्रमाणे अचानक हिरवाई दाटून येते. तसेच काहीतरी माझ्याबाबतीत घडले.

मी नीरज त्रिंबक आडे. मागील सात वर्षांपासून वास्तव्य पुण्यात, पण मूळचा आणि हाडाचा "नांदेडकर". माहिती तंत्रज्ञान शाखेत अभियांत्रिकीची पदवी मिळविल्यानंतर आता व्यवस्थापन शास्त्रात पदव्युत्तर शिक्षण घेत आहे. नांडेदच्या "नेहरु इंग्लिश स्कूल" मधून माझे शालेय शिक्षण झाले. इंग्रजी माध्यमातून शिक्षण झाल्यामुळे मराठीशी संबंध तसा खूप कमी आला, कारण आई वडील दोघेही नोकरी करणारे आणि शाळेतले बहुतांश मित्र अमराठी. पण १२वी नंतर पुण्यासारख्या मराठीच्या सांस्कृतिक माहेरघरी आलो आणि इथेच माझा संबंध "ऑर्कूट"वरील "मराठी कविता" आणि "काव्यांजली" समूहांशी आला आणि अक्षरशः मला माझ्यातल्याच खजीन्याचा शोध लागला.



**नीरज आडे**

*अतिथी संपादक – पुणे*

एक साधीशी फुंकर बासरीतून गेली तर सप्तस्वरांचीच ओजस्वी बरसात करते ! असेच काहीसे माझेही झाले. या समूहावर मला माझी कवी म्हणुन ओळख मिळाली. अर्थात यात इथल्या प्रत्येकाचा मोलाचा वाटा आहे. नाम काकांची शाबासकीची थाप, काहीतरी नवं करण्याची उमेद आजही देते. इथे येऊन माझ्यतला तरल कवी जसा उमलून आला, तसेच अजूनही बरेच काही मला गवसले. साधारण दिड वर्षांपासून मी, इंटरनेटवरील काव्यविश्वात एक चळवळ ठरलेल्या "मराठी कविता" या ऑर्कूट्वरील समुहाच्या संचालकाची भूमिका सांभाळतो आहे. त्यामुळे, इथे राबविल्या जाणाऱ्या विविध स्पर्धा, विविध उपक्रम, काव्य मेळावे, इ साठी आयोजकाच्या भूमिकेत कार्य करण्याची संधी मला मिळत आली आहे.

माणसांना बांधून ठेवून "टीम वर्क" कसे साधायचे, ते आमच्या "ई-साहीत्य प्रतिष्ठान" आयोजीत "ई-वर्ले अक्षर, पुणे- २०१०" या कार्यक्रमाने मला शिकवले. सगळ्यांच्या सहकार्याने, यातील मीडिया आणि संबंधीत जबाबदारी मी पार पाडली, तसेच स्टेज परफॉर्मन्सही दिला. पूर्णत्वाची नशा मी ईथेच चाखली.

## "लिहा ओळीवर कविता" उपक्रमाबद्दल...

विविध उपक्रम राबवणे, आणि तेही नियमित व सातत्याने, हे ऑर्कुटवरील आमच्या "मराठी कविता" समूहाचे नेहमीच वैशिष्ठ्य ठरले आहे. इथला असाच एक सर्वात लोकप्रिय उपक्रम म्हणजे "लिहा ओळीवर कविता". जास्तीत जास्त सदस्यांपर्यंत पोचण्यासाठी आणि त्यांचा सहभाग वाढविण्यासाठी खरे तर हा उपक्रम सुरु केला गेला आणि आमचा विश्वास सार्थ ठरवला तो इथल्या सदस्यांनी त्यांच्या सहभागाद्वारे.

हा उपक्रम, दर सोमवार ते रविवार, असा साप्ताहिक तत्वावर राबविला जातो. दर सोमवारी एक ओळ देण्यात येते, आणि ती ओळ आपल्या कवितेत गुंफून येथील कवी मंडळी, त्यांच्या एक किंवा अधिक कविता आठवड्याभरात पोस्ट करतात. प्रत्येक कवितेचे सखोल विश्लेषण व रसग्रहण केले जाते व त्यांना अभिप्राय देण्यात येतो.

साधारणतः २००८ साली "रेणुका रेपाळ-खटावकर" ही सदस्या, या उपक्रमाचे नियमित संयोजन करायची. कालांतराने या उपक्रमात थोडासा खंड पडला ! पण मागील तब्बल २ वर्षांपासून हा उपक्रम पुन्हा त्याच थाटाने नियमित राबविला जातो आहे. यात मोलाचे योगदान दिले आहे ते म्हणजे समूहावरील "कल्पी जोशी" यांनी, ज्यांनी हा उपक्रम संचालक मंडळाच्या वतीने जवळपास एक वर्ष, एक हाती, अखंड राबविला.

त्यानंतर, संचालक मंडळातील आकाश बिरारी आणि तुषार जोशी, म्हणजेच आमचे आकाश दा आणि तुषार दा, यांनी या उपक्रमाला एक लयबध्द आयाम देण्यासाठी सूत्रं हाती घेतली. त्यांनी त्यांच्या काव्यसाधनेच्या व व्यवस्थापकीय कौशल्याच्या आधाराने या उपक्रमात काही नवे बदल घडवून आणले व उपक्रमाला नवी उंची गाठून दिली. साहजिकच सदस्यांचा सहभाग वाढला. अनेक नवे सभासदही उपक्रमाकडे आकर्षित झाले. कवितांना दर्जा तर नेहमीच उच्च मिळत आला होताच, पण आता रचनांची संख्याही वाढू लागली. दर आठवड्यात या उपक्रमाला किमान ४०-५० कवितांचा सहभाग असतो. एका आठवड्यात एवढ्या कविता एकाच प्रेरणेमुळे लिहिल्या जातात आणि मराठी साहित्यात एवढी भर पडते, याचा आम्हाला अभिमान आहे !

प्रत्यके आठवड्याच्या ओळीत आम्ही सदैव वैविध्य आणायचा प्रयत्न करित असतो. आत्तापर्यंतच्या ओळींपैकी काही ओळी खालीलप्रमाणे-

- पापण्यांना भार झाली आसवे
- सांजवेळी सोबतीला
- मी एकटाच येथे माझ्या जगात आहे
- माळून काजव्यांना आल्या निजून राती
- तुझा दोष नाही, इ

अश्या वृत्तबद्ध ओळींवरील कविता आपसूकच लयबद्ध असतात. अशाप्रकारे ती दिलेली एकच ओळ, वेगवेगळ्या काव्यप्रकारात वापरली जाऊ शकते. एकाच ओळीवर आम्हाला गज़ल, छंदबद्ध कविता, लयबद्ध गीत, अभंग, लावणी, मुक्तछंद, अशा विविध काव्यप्रकारातील रचना वाचायला मिळतात.

या उपक्रमामुळे एक अतिशय महत्वपुर्ण बदल घडल्याचा जाणवतो आहे. तो म्हणजे, हल्ली वृत्तबद्ध कवितांच्या संख्येत अचानकच लक्षणीय वाढ अनुभवायला मिळाली आहे. आणि हा बदल, उपक्रमातल्याच नव्हे तर सदस्यांच्या इतर कवितांतही दिसून आला आहे. असे अभिप्राय सदस्यांनी स्वतःहून आमच्यापर्यंत पोचवले आहेत. या उपक्रमाने अश्या अनेक बाबतीत कवी सदस्यांना प्रेरीत केले आहे. इथेच उपक्रम साध्य होतो, असे मला वाटते.

# "तुझा दोष नाही"

यशाच्या शिखरावर असताना या उपक्रमाची धुरा माझ्या हातात आली. कदाचित यश मिळणं सोपं असतं, पण मिळालेलं टिकवणं अवघड असतं, याचा मला प्रत्यय येत होता. तो उपक्रम आठवडाभर चालवण्याची संधी मला मिळाली. खरी सुरुवात झाली ती ओळ निवडण्यापासुन.

आधिच्या भागात उल्लेखल्या प्रमाणे, आम्ही जेंव्हा ओळ देतो, तेंव्हा ती खूप विचारपूर्वक देतो. ओळ शक्यतो वृत्तबद्ध निवडतो, जेणेकरून ती ओळ वापरून वृत्तबद्ध कविता व गज़लाही लिहीणे शक्य होईल. शिवाय ओळ अशी देण्याचा प्रयत्न होतो की ती एकच ओळ वेगवेगळ्या भावनांच्या कवितेत गुंफता येऊ शकेल आणि वेगवेगळे भावार्थ असणार्‍या कविता लिहीता येतील. या अश्या प्रयोगाने खूप वैविध्य मिळते, असा एकंदरीत आमचा अनुभव आहे.

माझ्यासमोरही हेच आव्हान होते. ओळ वृत्तबद्ध हवी होती आणि सोपी सुद्धा ज्यातून वेगवेगळ्या रंगातल्या कविता येऊ शकतील. ती अशीच असावी, ती तशीच असावी, म्हणून मग विचारही करावा लागला ज्याचीही सवय फारशी नव्हती. आणि मग सहजच बर्‍याच दिवसांपासून काहीतरी मनात होतं, त्याने शब्द रुप घेतले आणि "तुझा दोष नाही" हे शब्द उतरले. ओळ तर सोपी होतीच शिवाय "लगागा लगागा" या सुरेख आणि मोस्ट फेव्हरेट वृत्तातही बसत होती.

वाटलं की, चला आता आपण आरामात फक्त कविता वाचायच्या. कविता येऊ लागल्या आणि मग खऱ्या अर्थाने मला जबाबदारी वाटू लागली. या एका ओळीवर आठवडाभरात तब्बल ६० रचना आल्या, जी एक विक्रमी नोंद ठरली ! कवी सदस्यांनी ही ओळ वेगवेगळ्या काव्यप्रकारांत गुंफून विविध रचना दिल्या. एखाद्या चांगल्या कवितेलाही योग्य न्याय द्यायचा म्हणजे खरेच कसोटी होती. कधी कधी कविताच एवढी सुंदर असयची की माझेच शब्द रुसून असहकार करायचे. कधी कधी कवितेतलं काहीतरी खटकायचं, पण सगळी आपलीच माणसं असल्याने समजून घेतील अशी खात्री होती. पण त्यांना दुखावणेही जीवावर यायचे. अश्यातून माझ्यातला समीक्षक तावून सुलाखून निघाला. योग्य जागी योग्य शब्द आपोआप मिळत गेले. हा प्रवास हा अनुभव मी खूप खूप आसुसून उपभोगला आणि खुप काही मिळवलं. एक सशक्त ओळख आणि सगळ्यांचे अपरिमित प्रेम. तेव्हा या अनुभवाने मला खऱ्या अर्थाने समृध्द केले, जाणीवांना धार दिली आणि शब्दांना नवीन आयाम.

आभार मानून मला कुणालाही परके करायचे नाही. त्यामुळे या ऋणातच आयुष्यभर रहायला आवडेल ! आज **"नेटाक्षरी"** ने हा उपक्रम अगदी कानाकोपऱ्यात पोचवायचे हाती घेतले आणि खऱ्या अर्थाने हा उपक्रम यशस्वी आहे हे आतून जाणवले. आता तर जबाबदारी दुप्पटीने वाढली. नजर जरी आकाशाकडे असली तरी पाळमुळं जमिनीमध्ये घट्ट आहेत. तेव्हा तुमच्या आशीर्वादाची आणि प्रेमाची अखंड बरसात अशीच होत राहो, ही प्रार्थना ! सगळे इतके चांगले चालूच आहे, तेव्हा आत्ताच माझे मागणेही तमाम रसिकांच्या पायी घालतो. जेव्हा जेव्हा तुम्हाला ताजेतवाने व्हायची गरज वाटेल, तेव्हा हा समुह आणि हा उपक्रम तुमचा आनंद द्वीगुणीत करायला आणि दु:खाला वाट द्यायला सदैव तत्पर असेल. सध्या रजा घेतो आणि तुम्ही हा अंक नक्की एन्जॉय कराल याची खात्री देतो...

**नीरज आडे**

(या पुढे यशाकडे अखंड झेप घ्यायची)

अतिथी संपादक – पुणे

# तुझा दोष नाही

क्रांती यांची स्त्रीत्वावर वक्तव्य करणारी ही एक गझल. अप्रतिम काफीये वापरले आहेत. उत्कट भावनांनी ओतप्रोत असणारी रचना.

तुझ्या पतिव्रत्यास अग्नीपरीक्षा , तुझा दोष नाही
खरे नेहमी भोगती हीच शिक्षा, तुझा दोष नाही

तुझ्या सोबतीला कुणी न येथे, तुझा आसरा तू,
तुझ्या सावलीला तुझी ना प्रतिक्षा , तुझा दोष नाही

तुझा धर्म मानव्य, त्याला नसे आकृतीबंध काही,
नसे ग्रंथ, ना चौकटी कि न दिक्षा, तुझा दोष नाही

तुझ्या मुक्त काव्यातही छंद आहे, खुला बंध आहे
कुणा लेख वाटो, कुणाला समीक्षा, तुझा दोष नाही

दिली लक्ष्मणाने तुला रेघ आखुन, तो मुक्त झाला,
तुला संस्कृती सांगते, “घाल भिक्षा” , तुझा दोष नाही

तुझी तुच बेडी, तुझी तुच कारा, तुझा तुच कैदी,
तुझा तु गुन्हा अन, तुझी तुझ शिक्षा, तुझा दोष नाही ?



## क्रांति सडेकर

# तुझा दोष नाही

आकाश बिरारी यांची उपमा अलंकाराने समृद्ध अशी ही रोमॅन्टीक गझल. प्रत्येक शेर सखीला "तुझा दोष नाही, हा तर तुझ्या लावण्याचा दोष" असे सांगणारा....

तुला पाहता लोक आसक्त व्हावे , तुझा दोष नाही
तुला पाहुनी ब्रम्हचारी झुरावे, तुझा दोष नाही

तुझा स्पर्श होता हवा शाहरुनी जरा मंद व्हावी,
दिशांनी, ऋतुंनी तुझे गीत गावे, तुझा दोष नाही

तुला पाहण्या सांजवेळी किती चंद्र आतूर होतो
उशीरा "र वी" ने कधी मावळावे, तुझा दोष नाही

रुपाचा खजिना असा वर्णवाया नसे वृत्त काही
तुला रेखण्या मुक्तछंदात जावे, तुझा दोष नाही

मला लागता झोप, येते पुन्हा जाग रात्री कितीदा
पहाटे उशाला तुझे स्वप्न यावे, तुझा दोष नाही

तुझ्या चाहुलीने नशा हाय चढते, मला धुंद करते
उता-यास फ़िरुनी, तुला मी स्मरावे, तुझा दोष नाही

तुला आशिकांची, तुझ्या चाहत्यांची, तमा का असावी?
"फ़ुलांनी फ़ुलावे , भ्रमर गुंतवावे", तुझा दोष नाही

## आकाश बिरारी (लंडन)

# तुझा दोष नाही

डॉ. परमेश्वर यांची ही कविता, आजच्या पालकत्वावर अचूक भाष्य करणारी आणि त्यांची आगतिकता मांडणारी भावस्पर्शी कविता....

काय सांगु बाळा मी गुन्हेगार तुझी
तुझा दोष नाही ही सत्वपरीक्षा माझी

कळे मला जीव तुझा माझ्यासाठी झुरे
जगण्याची धडपड बाळा जीवघेणी ठरे

गेले तुझे बालपण कोमेजुन असे
तुझा दोष नाही परी सांगु तरी कसे ?

हाती पाटी येता झाली चढाओढ सुरु
भेटणारा हरएक झाला तुझा गुरु

नंबर आणि मार्कांचा सुरु झाला खेळ
गणगोतासाठी परी राहिला ना वेळ

हरवल्या दिशा सा-या, हरवली नाती
तुझा दोष नाही काय माझ्या उरे हाती ?



**डॉ. परमेश्वर**

# तुझा दोष नाही  (लावणी)

ही ओळ वापरुन "लावणी" सुद्धा लिहिली जाईल, असा स्वप्नातही मी विचार केला नव्हता. पण साधनाजींनी त्यांच्या रचनेने, ते सत्यात उतरवले. अक्षरशः फेटे उडवेल अशी शब्द रचना....

तुझा दोष नाही, ही सारी ज्वानीचीच करणी
मागे लागल कुणी-कुणी, नार नवेली टु तरणी ।।धृ।।

नखरा आहे सोळाचा ग, मदनिकेचा तोरा
रुपयौवना, सुंदरी, तू इंद्रपुरी अप्सरा
नको करु शिणगार, तुला ग नजर लावल कुणी ।१।।

शालु हिरवा बुट्टेदार, पदर जरी किनर
नाकामधे नथ सोन्याची, कंठी मोत्याचा सर
राया तुम्ही आणा हिला एक पैठणची पैठणी ।।२।।

स्वर्गीची तू रंभा मेनका, पृथ्वीवरती आली
नाचता अशी बिजलीवानी, दुनिया खुळावली
नजरेचा तू तीर मारता, कुणी न मागे पाणी ।।३।।

**साधना**

# भावाचा भुकेला

त्या पराशक्तीची जाणीव करुन देणारी आणि “ऱ्तू नये मातू नये” हा संदेश देणारी
अरविंद चौधरी यांची वेगळया धाटणीची कविता

पोटात अन्नाचा  कण नाही,
अंगावर पुरेसं वस्त्र नाही,
फिरत फिरत आलास देवळापाशी
दीनता डोळयात पाहता तुझी,
मला दया आली तुझी

भटकू लागलास पुन्हा तू
आवाज तुझा ऐकून,
जेवण आपले अपुरे सोडून,
एक माणूस बाहेर आला,
तुटून पडलास तू
तुझा चेहरा पाहून
दात्याचेच पोट भरले

आठवते तुला ?

आज तु महागड्या गाडीत फिरतोस
उंची वस्त्र परिधान करतोस,
समोरच्याला तुच्छ लेखतोस,
पैशाच्या  गादीवर लोळण घेतोस,
मजकडे पहायला तुला वेळ  नाही
यात तुझी चूक नाही,
तुझा दोष नाही

अरे मी तर भिकारी
नामाचा भुकेला
भावाचा भुकेला



## अरविंद चौधरी

# तुझा दोष नाही

गझलेचा उत्तम नमुना. संपुर्ण गझल जितकी बोलते, त्याहून अधिक प्रत्येक शेर वेगळा आणि संपुर्ण कवितेचा अनुभव देते. ही अभिजीत यांची सर्वांग सुंदर गझल....

तुझा दोष नाही , तुझी चुक नाही
जळाने शमावी अशी भुक नाही

कसे धावते विश्व आश्चर्य आहे
कुणाच्याच हातात चाबूक नाही

लिलावी स्वतःलाच मांडेन म्हणतो
मला मोल माझेच ठाऊक नाही

जरा पाहता रोखुनी, ती म्हणाली
गझल तु करावीस, चेटूक नाही

कशाला कहाणी जगा ऐकवू मी
कुणी एवढा येथे भावूक नाही

जरी मानतो चौकटी काफ़ियांच्या
गझलकार हा कूपमंडूक नाही

**अभिजीत दाते**

# जीवनास

आयुष्याच्या खाचा खोचा आणि स्निग्धता अगदी ओघवत्या शैलीत मांडणारी कविता मोकाशी यांची सबकुछ आयुष्य मांडणारी कविता....

विकावे लागते इथे सर्व काही
अरे जीवना तुझा दोष नाही

सुनी वेदना टाक रद्दीत आता
नवा रोज तू थाट दरबार शाही

लढाईत जो तो म्हणे यास मृत्यु
तसा यास मी पोसतो बारमाही

पगारात त्या राबती चिल्लरी रे
तुझी फ़ाटकी नोट त्याचीच ग्वाही

असाही तसाही कसाही असा मी
मला ओळखीचा नसे एकदाही

## कविता मोकाशी



# तुझा दोष नाही

सीता आणि द्रौपदी या दोन वंदनीय पंचकन्यांची व्यथा जीवंत करणारी हरिश दांगट यांची ही ऑघवती कविता..जया अंगी मोठेपण तया यातना कठीण” हे अधोरेखित करणारी

महापतिव्रता असशी
कुलश्रेष्ठ तु आर्या
पुरुषार्थाच्या तराजूत
तोलली गेली भार्या

पातक काय करतो
रघुरायास होश नाही
अश्रु आवर सिते
हा तुझा दोष नाही

जगजेत्या महाबलीचा
जुगारात झाला फ़ज्जा
पाच विरांची पत्नी
भरसभेत लुटलई लज्जा

पापाचा दरबार भरला
पुण्याचा घोष नाही
अश्रु आवर पांचाली
हा तुझा दोष नाही



## हरीश दांगट

# तुझा दोष नाही

विरहातल्या वेदना आणि अंतरांमुळे होणारी हुरहुर मांडणारी ही डॉ. अशोक यांची कविता...

“तुझा दोष नाही” असं तो म्हणाला

आणी निघुन गेला

इथे मी एकटीच

स्वतःला दोष देत बसलेय

माझा दोष नाही

त्याचाही दोष नाही

मग हे असं का झालंय?

आम्ही दोघे . . . .

आणि मधे आता फ़क्त भुतकाळ

भविष्य नाही

वर्तमान नाही

तो ही नाही

फ़क्त त्याचे शब्द . . .

“तुझा दोष नाही”



## डॉ.अशोक

# तुझा दोष नाही

शृंगार रस आणि प्रणयरंग हळूवार उलगडणारी ही अनुजा मुळये यांची ही सुंदर कविता. रुपक, प्रतिक व उपमा अश्या विविध अलंकारांनी सजलेली....

तुझा दोष नाही सुर्यास घाई उजाडण्याची
सोडवेना परी सख्य तुझी मिठी ही मधाची

तुझा दोष नाही दवास सांडायचे होते पहाटे
ओठात तुझ्या पण अजुनी कोवळे पाते नहाते

तुझा दोष नाही प्राजक्त तिष्ठला असे अंगणात
परी जुईचा सुवास तुझा भिनला कसा श्वासात

तुझा दोष नाही भैरवी गात चांदणे उभे नभात
मल्हार वेडे स्पर्श तुझे हे उमलतात स्पंदनात

तुझा दोष नाही कवेत घेण्या आतुरला पहाटगारवा
उष्ण तुझ्या बाहुतला पण अजुनी हा करतो मारवा

तुझा दोष नाही सख्या रे मावळती ती चांदरात
चांदण्याचे स्वप्न माझे वळुनी थांबले उंब-यात

## अनुजा मुळये

# मुखवट्यावरी चेहरा टांगताना

मनाची समीक्षा करणारी मंदार चोळकर यांची कविता. मनाची मानवी जीवनावरची अगाध सत्ता दाखवून देणारी. “मन लहरी लहरी, त्याच न्यारं रे तंतर. अरं इंचू साप बरा, याला उतारे मंतर” याचा अनुभव म्हणजे ही कविता....

मनी कामना ठेऊनी भोगण्याची
तडजोड तरीही सुखे त्यागण्याची
नजरेत दिसते तुझ्या वासनाही
विकारी मना तुझा दोष नाही

झोळी पसरली परी याचना, ना
भुकेला असुनी ही उणे काढताना
म्हणे माज करुनीच भिक्षांदेही
भिकारी मना हा तुझा दोष नाही

जगाला मिरवशी जणु सर्वज्ञानी
सिध्द करण्यांस शोधी महामुर्ख कोणी
सदासर्वदा दुस-या पाण्यात पाही
शिकारी मना हा तुझा दोष नाही

स्वतःची फुका कौतुके सांगताना
मुखवट्यावरी चेहरा टांगताना
खेळतो भावनांशी असाही..तसाही
मदारी मना  हा तुझा दोष नाही

कुणाचे कुठे चालले काय आहे ?
उगाचच कधी खेचुनी पाय पाहे
तुझ्या वागण्याला अरे पोच काही ?
आजारी मना हा तुझा दोष नाही



**मंदार चोळकर**

मराठी रसिकांना नेहमी उत्तमोत्तम आणि नवनवीन काव्य पुरविण्याचा ई-साहित्य प्रतिष्ठानचा ध्यास ‘नेटाक्षरी’ जोमाने पार पाडत आहे. दर आठवड्यात मिळणा-या तुमच्या प्रतिसादांनी आमचा उत्साह उधाण होतोय. आमच्या रसिक वाचकांच्या ह्याच उत्स्फ़ुर्त प्रतिसादामुळे नेटाक्षरी लवकरच शतक गाठेल. नेटाक्षरी हा साप्ताहिक अंक सध्या सुमारे ८०००० हून अधिक मराठी रसिकांना विनामूल्य वितरीत केला जातो. त्या व्यतिरिक्त वेबसाईट्वर व्हिजिट करुन वाचणा-यांची संख्या लक्षणीय आहे. हा अंक आपण आपल्या ईष्टमित्रांना फॉरवर्ड करुन त्यांनाही या आनंदयात्रेत सहभागी करुन घ्यावे ही विनंती. असे करताना **netaksharee@gmail.com** या आमच्या आयडीचा अंतर्भाव कराल ? मग नंतरचे अंक आम्ही त्यांना पाठवत राहू. मराठी कवितेची लोकप्रियता वाढवण्यास आपला हातभार लागावा ही इच्छा. आपल्या सारख्या रसिकांच्या सहाय्याने हा अंक लवकरच एक लक्ष वाचकांपर्यंत नियमित पोहचवण्याचा आमचा संकल्प सिध्दीस जाईल असा आम्हाला विश्वास आहे.

